राज्यातील क्षेत्रीय ग्रामीण बँकेच्या संचालक मंडळावर शासनाचे दोन प्रतिनिधी संचालक म्हणून नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आरआरबी-२०१३/प्र क्र १००/कार्या-१४१७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: १६ मार्च, २०१५.

**वाचा -**

**१) शासन निर्णय क्र. प्राग्राबँ-२०१०/प्र.क्र.१२०/१०/का-१४१७, दिनांक २ नोव्हेंबर २०१०.**

**प्रस्तावना -**

राज्यातील क्षेत्रीय ग्रामीण बँकांवर विभागीय ग्रामीण बँक नियमावली प्रकरण क्रमांक ३ कलम ९ (१) (इ) नुसार राज्य शासनाच्या दोन प्रतिनिधींची संचालक म्हणून नियुक्ती करण्यात येते. उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामीण बँकेच्या संचालक मंडळावर शासनाच्या प्रतिनिधीची नियुक्ती करण्यात आली आहे. या प्रतिनिधींची मुदत संपुष्टात आल्याने नवीन प्रतिनिधींची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन क्षेत्रीय ग्रामीण बँकांच्या संचालक मंडळावर नामनिर्देशित संचालक म्हणून संबंधित बँकेच्या समोर दर्शविलेल्या अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे शासनाचे प्रतिनिधी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | बँकेचे नाव | कार्यक्षेत्र | राज्याने नियुक्त केलेले शासनाचे प्रतिनिधी |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र ग्रामीण बँक मुख्यालय : औरंगाबाद | नांदेड, परभणी, हिंगोली, बीड, लातूर, जालना, उस्मानाबाद, औरंगाबाद, ठाणे, पुणे, अहमदनगर, जळगांव, नाशिक, रायगड, धुळे, नंदुरबार व पालघर | अतिरिक्त आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद अतिरिक्त आयुक्त विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक |

१. विभागीय ग्रामीण बँक नियमावलीतील प्रकरण क्र.३ मधील नियम क्र.१० अन्वये उपरोक्त प्रतिनिधींची नियुक्ती ही त्यांना सदर पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून दोन वर्षांचा कालावधीसाठी करण्यात येत आहे.

२. विभागीय ग्रामीण बँकांचा त्यांच्या कार्यक्षेत्रातील आर्थिक विकासात सहभाग असतो. त्यामुळे या संदर्भात होणाऱ्या चर्चेत सर्व सदस्यांच्या सक्रीय सहभागामुळे पतवितरणाच्या विविध क्षेत्रांमध्ये विभागीय ग्रामीण बँका सक्रीयपणे सहभागी होण्यास मदत व्हावी या दृष्टीने सदर बँकावर शासकीय प्रतिनिधी नियुक्त केले जातात. त्यामुळे शासन नियुक्त प्रतिनिधींनी आपल्या कार्यालयातील अत्यंत तातडीची व महत्वाची प्रकरणे वगळता अन्य प्रसंगी संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहणे अनिवार्य आहे. वर्जित प्रयोजनांसाठी अनुपस्थित राहण्याबाबत शासनास तसेच बँकेस लेखी कळविणे आवश्यक राहील.

३. हा शासन निर्णय प्रादेशिक ग्रामीण बँक अधिनियम १९७६ मधील प्रकरण क्र.३ मधील कलम ९(१) (इ) नुसार शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१२२७३५९८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.03.16 12:37:57 +05'30'

(वसंत कुळकर्णी)
उप सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग/रोजगार व स्वयंरोजगार विभाग/ग्राम विकास व जलसंधारण विभाग/महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. सर्व विभागीय आयुक्त

६. अतिरिक्त आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर/अमरावती .

७. सर्व जिल्हाधिकारी

८. अध्यक्ष तथा नियंत्रक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, पुणे

९. सर्व उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय

१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद तथा कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा

११.अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामीण बँक, औरंगाबाद.

१२.प्रधान सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक

१३.निवडनस्ती, १४१७.